

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्र. संकीर्ण-६०२१/प्र.क्र.२०२/ना.पु.१५**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०२२.

विषय :- **कै.मनोज नामदेव सपकाळे, पुरवठा निरीक्षक, तहसिल कार्यालय, जामनेर, जिल्हा जळगाव यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१.
२) जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव (टंचाई शाखा) यांचे पत्र क्र.टंचाई-३/ कावि/२०२१/७/५३/७१५, दि.२४/०६/२०२१.

**ज्ञापन :-**

तहसिल कार्यालय,जामनेर जिल्हा जळगाव येथे कार्यरत कै.मनोज नामदेव सपकाळे, पुरवठा निरीक्षक यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक ०६/०५/२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. जिल्हधिकारी कार्यालय, जळगाव (टंचाई शाखा) यांनी उक्त मृत पुरवठा निरीक्षक, कै.मनोज नामदेव सपकाळे यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. मा.जिल्हाधिकारी, जळगाव यांनी कै.मनोज सपकाळे यांना कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत होते, असे नमूद केले आहे.

४. **जिल्हाधिकारी, जळगाव तसेच तहसिलदार, जामनेर** यांनी कै.मनोज सपकाळे यांना चिन्मय हॉस्पिटल ॲंड क्रिटीकल केअर सेंटर, जळगाव येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात म्हणजे ते कार्यालयात कर्तव्यावर हजर होते, असे प्रमाणित केले आहे.

५. चिन्मय हॉस्पिटल ॲंड क्रिटीकल केअर सेंटर, जळगाव यांनी कै. मनोज सपकाळे यांचा मृत्यू हा “कोव्हीड -१९” या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

६. **उप निबंधक (जन्म व मृत्यू) नोंदणी कार्यालय, जळगाव महानगरपालिका** यांनी कै.मनोज सपकाळे यांचा मृत्यू हा **दिनांक ६/५/२०२१** रोजी झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

७. कै. मनोज सपकाळे यांच्या **पत्नी श्रीम.अनिता सपकाळे** यांनी रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा दिनांक २१/०५/२०२१ रोजीचा **विनंती अर्ज तहसिलदार**, जामनेर यांना सादर केलेला आहे.

८. त्यानुसार जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव (टंचाई शाखा) यांनी तहसिल कार्यालय, जामनेर येथे कार्यरत असलेले पुरवठा निरीक्षक, कै.मनोज सपकाळे यांच्या कुटुंबियांना रक्कम रु.५०.०० लक्ष/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

९. उक्त खर्च "मागणी क्र.एम-२, प्रधान लेखाशीर्ष २४०८- अन्न,साठवण व वखार, उप प्रधान शीर्ष १०१-प्रापण व पुरवठा, गौण शीर्ष (०३),प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण अंतर्गत "(०३) (०२) मुफसल (अनिवार्य) (२४०८०१०८) या उपलेखाशीर्षाखाली १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदरचे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१२५१७०७४१७८०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.01.25 17:08:33 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

तहसिल कार्यालय, जामनेर, जिल्हा जळगाव.

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) आहरण व संवितरण अधिकारी, जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालय, जळगाव
२) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव.

**प्रत माहितीस्तव-**

१) मा.जिल्हाधिकारी जळगाव.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई.
३) वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय,अ.ना.पु.व.ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
४) श्रीम.अनिता मनोज सपकाळे, (जिल्हाधिकारी कार्यालय जळगाव (टंचाई शाखा) यांच्यामार्फत)
५) निवडनस्ती, ना.पु.१५.